**स्थलांतरीत कामगारांची माहिती एकत्रित करण्याकरिता महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई यांनी विकसीत केलेल्या सध्याच्या संगणक प्रणालीमध्ये बदल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्थलांका २०२०/०७/ प्र.क्र.८६/ कामगार - १०**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १३ ऑगस्ट, २०२०.

**प्रस्तावना :**

कोविड-१९ च्या देशभरात झालेल्या प्रादुर्भावामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीत महाराष्ट्र राज्यातील अनेक मजूरांनी त्यांच्या मूळ राज्यात, उदा. मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश, बिहार, इ. ठिकाणी स्थलांतर केले आहे. तसेच काही स्थलांतरीत कामगार त्यांच्या मूळ राज्यातून महाराष्ट्रात परत येत आहेत. अशा सर्व स्थलांतरीत कामगारांची संपूर्ण/ सविस्तर माहिती संगणकीकृत पध्दतीने ठेवण्याच्या सूचना मा. सचिव, श्रम व रोजगार मंत्रालय, केंद्र शासन यांनी त्यांच्या दिनाक १९/६/२०२० च्या अर्ध शासकीय पत्रान्वये दिल्या आहेत. केंद्र शासनाच्या सूचनांनुसार स्थलांतरीत कामगारांची माहिती त्वरित उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे. सद्य:स्थितीत महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळामार्फत संगणक प्रणाली तयार करण्यात आली असून ती सर्वसमावेशक व कामगारांची संपूर्ण माहिती प्राप्त करणारी आहे. त्याच प्रणालीमध्ये सर्वच असंघटित व स्थलांतरीत कामगारांची माहिती एकत्रित करणे शक्य होणार आहे. केंद्र शासनाच्या सूचनांच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळाच्या सध्याच्या संगणक प्रणालीमध्ये बदल करण्याच्या सूचना आज्ञावली विकासकाला देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कोविड-१९ च्या देशभरात झालेल्या प्रादुर्भावामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीत महाराष्ट्र राज्यातील अनेक मजूरांनी त्यांच्या मूळ राज्यात, उदा. मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश, बिहार, इ. ठिकाणी तसेच त्यांच्या मूळ राज्यातून परत महाराष्ट्रात स्थलांतर केले आहे. अशा सर्व स्थलांतरीत कामगारांची संपूर्ण/ सविस्तर माहिती संगणकीकृत पध्दतीने ठेवणे आवश्यक आहे. केंद्र शासनाच्या श्रम रोजगार मंत्रालयाच्या दिनांक ३०/०६/२०२० च्या पत्रान्वये आंतरराज्य स्थलांतरीत कामगारांसंदर्भात विविध प्रकाराच्या २२१ रोजगारांतील असंघटीत कामगारांची यादी नमूद करण्यात आलेली आहे. जनगणना विभागाची २५० रोजगारांची यादी, कामगार विभागाची १२२ रोजगारांची यादी व केंद्र शासनाची २२१ रोजगारांची यादी

एकत्रित करुन ३०० प्रकारच्या रोजगारांची यादी संकलित करण्यात आली आहे. असंघटीत/ स्थलांतरीत कामगारांची माहिती प्राप्त करताना या ३०० रोजगारांच्या यादीचा वापर करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत. (यादी सोबत जोडण्यात येत आहे).

२. महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळामार्फत आस्थापनेवर ५ किंवा त्यापेक्षा जास्त कामगार असलेल्या आस्थापनेकडील कामगारांची माहिती ठेवण्याचे प्रयोजन असून त्यानुसार महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळाकडून संगणक आज्ञावली तयार करण्यात आली आहे. सदर संगणक आज्ञावली ऑनलाईन पद्धतीने, आस्थापना, त्यातील कामगार व त्यांच्याकडून प्राप्त होणारे अंशदान यांची माहिती ठेवते. या संगणक आज्ञावलीमध्ये नोंदणी करण्यात येणा-या कामगारांमध्ये संघटीत, असंघटीत, स्थलांतरीत तसेच कायम रहिवासी असलेल्या कामगारांचा समावेश आहे. असंघटीत कामगार सामाजिक सुरक्षा कायदा, २००८ मध्ये असंघटीत क्षेत्र म्हणजे ज्या उद्योगात १० पेक्षा कमी कामगार काम करतात अशा क्षेत्रांचा समावेश होतो. त्यामुळे असंघटीत कामगारांमध्ये घरुन काम करणारे कामगार, स्वयंरोजगारीत कामगार तसेच मजुरीवर जाणारे कामगार, या असंघटीत क्षेत्रातील कामगारांचा तसेच संघटीत क्षेत्रातील महाराष्ट्र कामगार कल्याण अधिनियमाच्या परिशिष्ट २ मध्ये नमूद केलेल्या अन्य कामगारांचा देखील समावेश होतो. असंघटीत कामगारांच्या नोंदणीबरोबरच आंतरराज्य स्थलांतरीत कामगारांची देखील नोंदणी होणे आवश्यक आहे. जरी महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, २०१७, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार अधिनियम, १९९६, कारखाना अधिनियम, १९४८ व कंत्राटी कामगार अधिनियम, १९७०, या विविध कायदे व संबंधित नियमांत, कामगारांच्या, मजुरांच्या संख्येवरुन नोंदणी करणे अथवा न करणे यासंदर्भात तरतूदी असल्या तरी एकत्रित माहिती प्राप्त व्हावी यासाठी अशा सर्व कामगारांची नोंदणी करताना खालील १० प्रकारची माहिती नोंदणी अर्जामध्ये नमूद करणे आवश्यक आहे.

1. PAN - Alphanumeric - 10 Digits
2. TAN - Alphanumeric - 10 Digits
3. TIN - 11 Digits
4. GESTIN - 15 Digits
5. EPFO - 15Digits
6. ESIC - 17 Digits
7. MSEDCL Electricity Connection Number - 12 Digits
8. MCA CIN (if registered as Company) - 21 Digits
9. Aadhar Number - 12 Digits
10. Mobile Number - 10 Digits

३. महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई यांनी यापूर्वीच संकेतस्थळ विकसीत केले असून या संकेतस्थळावर केंद्र शासनाच्या सूचनांनुसार सचिव, श्रम व रोजगार मंत्रालय, केंद्र शासन यांना अभिप्रेत सर्व स्थलांतरीत व असंघटित कामगारांची नोंदणी करण्याची कार्यवाही करण्याबाबत प्रभारी कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई यांना सूचना देण्यात आल्या आहेत. यासाठी महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळाच्या सध्याच्या संगणक प्रणालीमध्ये आंतरराज्य स्थलांतरीत कामगार (रोजगाराचे नियमन व सेवेच्या अटी) कायदा, १९७९ ला अभिप्रेत असल्याप्रमाणे बदल करण्याच्या सूचना आज्ञावली विकासकाला देण्यात येत आहेत. त्यानुसार आज्ञावली विकासकाने सर्व स्थलांतरीत व असंघटित कामगारांची परिच्छेद-२ मध्ये नमूद केलेल्या १० बाबींसह माहिती संकलित करता येईल, अशा रीतीने महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळाच्या संगणकीय प्रणालीमध्ये आवश्यक बदल करावेत. याबाबत प्रभारी कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई यांनी उचित कार्यवाही करावी. संगणक आज्ञावलीमध्ये नव्याने करावयाच्या सदर बदलाकरिता होणा-या वाढीव खर्चाबाबतचा स्वतंत्र प्रस्ताव महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळाने शासनास सादर करावा.

४. कामगारांसंदर्भात परिच्छेद -२ मध्ये नमूद १० बाबींची माहिती दुकाने व आस्थापना नोंदणी, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळाकडील आस्थापना व कामगार नोंदणी, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम मंडळ यांच्याकडे होणारी आस्थापना व कामगारांची नोंदणी तसेच संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाकडे कारखाने नोंदणीच्या वेळी होणारी कामगारांची नोंदणी करताना घेण्यात यावी, असे निदेश कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, सचिव, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम मंडळ व प्रभारी कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ यांना देण्यात येत आहेत.

५. वरीलप्रमाणे संगणक आज्ञावलीमध्ये बदल करण्यात यावा. तसेच सर्व संघटीत, असंघटीत आणि आंतरराज्य स्थलांतरीत कामगारांची नोंदणी या नवीन संकेतस्थळावर करण्यात येत असल्याची माहिती सर्व कामगारांना व्हावी, यासाठी कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, सचिव, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम मंडळ व प्रभारी कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ यांनी जनजागृतीसाठी व्यापक प्रसिध्दी द्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१४१६३५१८०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr.Shrikant L. Pulkundwar

Digitally signed by Dr.Shrikant L. Pulkundwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, serialNumber=c10a1e6c8fbe08c1180978bd3ed8a151ed05202d522b09b9960341c2f080906d, cn=Dr.Shrikant L. Pulkundwar
Date: 2020.08.14 16:46:15 +05'30'

**(डॉ. श्री. ल. पुलकुंडवार)**
उप सचिव
उद्योग, उर्जा व कामगार विभाग

**प्रति,**

१. कामगार आयुक्त, मुंबई, कामगार भवन, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रे (पूर्व), मुंबई- ५१.
२. विकास आयुक्त (असंघटीत कामगार), बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रे (पूर्व), मुंबई- ५१
३. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बांद्रे (पूर्व), मुंबई- ५१.
४. सचिव, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम मंडळ, बांद्रे (पूर्व), मुंबई- ५१.
५. प्रभारी कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, हुतात्मा बाबू गेनू मुंबई गिरणी कामगार क्रीडा भवन, सेनापती बापट मार्ग, एलफिन्स्टन, मुंबई - १३.
६. निवड नस्ती (कामगार-१०).

**शासन निर्णय क्रमांक : स्थलांका २०२०/०७/प्र.क्र.८६/कामगार-१०, दिनांक १३ ऑगस्ट, २०२० सोबतचे विवरणपत्र**

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| **अ)** | **शेती व शेतीशी संबंधित** | **Agriculture & Related** |
| १. | शेतमजूर | Agriculture Labourer |
| २. | कृषी अवजारे हाताळणी | Agriculture machinery handling |
| ३. | पशुसंवर्धन | Animal Husbandry |
| ४. | काजू प्रक्रिया | Cashew processing |
| ५. | दुग्धशाळेतील कामगार | Dairy Farm Worker |
| ६. | दुग्धशाळा आणि प्रक्रिया व्यवसाय | Dairying and allied activities |
| ७. | मत्स्य प्रक्रिया | Fish processing |
| ८. | मच्छीमार आणि संबंधित कामगार | Fisherman & related worker |
| ९. | अन्न प्रक्रिया | Food Processing |
| १०. | (वन उपज) गोळा करणारे | Gatherer (Forest Produce, Firewood) |
| ११. | मध गोळा करणे | Honey gathering |
| १२. | फलोत्पादन आणि फुल शेती | Horticulture and Floriculture |
| १३. | वनीकरणासंबंधित मजूर | Labourer in Forestry |
| १४. | मळा कामगार (चहा / कॉफी इ.) | Labourer in Plantation (Tea/Coffee etc.) |
| १५. | कुक्कुटपालन व्यवसायाशी संबंधीत कामगार | Poultry Farm Worker |
| १६. | मीठागार शेती काम | Salt pan work |
| १७. | रेशीम पालन (रेशीम शेती) | Sericulture (Silk rearing) |
| १८. | मेषपालन (मेंढीपालन) | Shepherding |
| १९. | तेंदू पत्ता गोळा करणे | Tendu leaves collection |
| २०. | ताडी काढणे | Toddy tapping |
| **ब)** | **इमारत व संबंधित बांधकाम** | **Building & Construction Related** |
| २१. | इमारत व रस्ते देखभाल | Building and Road Maintenance |
| २२. | बांधकाम मजूर (सिमेंट, काँक्रीट, विटा इत्यादी उचलणे) | Construction Labourer (carry cement, concrete, bricks etc) |
| २३. | पदपथाचे किंवा सार्वजनिक उद्यान बांधकाम | Construction of Community Parks or Footpath |
| २४. | धरणे, पूल, रस्ते बांधकाम किंवा इमारत बांधकामाअंतर्गत कोणतीही कामे | Construction of Dams, Bridges, Roads or Any operations under Building construction |
| २५. | मनोरंजन सुविधांसह जलतरण तलाव, गोल्फ कोर्सचे बांधकाम | Construction of Swimming pool, Golf Course including any other recreational amenities |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| २६. | तंबू/मंडप यांची उभारणी/ कार्यक्रमाचे सुशोभिकरण व कार्यक्रमासाठी भांडी पुरविणारे कामगार | Construction of tents and pandals supply of utensils |
| २७. | बागकामसंबंधीत कामगार | Curator |
| २८. | मातीकाम | Earth Work |
| २९. | वाळू माती किंवा जाड वाळूचा उपसा | Extraction of Sand Soil or Core Sand |
| ३०. | जोडारी | Fitter |
| ३१. | खिड़की, तावदाने, दारे इ. बसविणे व त्यांची संरक्षक रचना तयार करणे | Fixing and modelling of Window, Grill, Doors etc. |
| ३२. | शितलीकरण व तापनयंत्रणा बसविणे व त्यांची दुरुस्ती (एसी / फ्रिज / कुलर / गिझर / वॉशिंग मशीन तंत्रज्ञ) | Fixing and repairing of cooling and heating Machinery (AC/Fridge/Cooler/Geyser/Washing Machine technician) |
| ३३. | अग्निशामक यंत्रणा बसविणे व त्यांची दुरुस्ती करणे | Fixing and repairing of fire Extinguishers System |
| ३४. | किचनमध्ये वापरण्यात येणारे मॉड्यूलर युनिट्स बसविणे व त्यांची जोडणी (फर्निचर आणि फिटिंग) | Fixing Modular units used in Kitchens (Furniture and Fitting) |
| ३५. | सुरक्षा दारे व इतर यंत्रणा बसविणे | Fixing Security gates or other Machineries |
| ३६. | पूर व्यवस्थापन किंवा संबंधित काम | Flood management or related work |
| ३७. | बागकाम आणि उद्याने देखभाल | Gardening and parks maintenance |
| ३८. | ग्लास कटर/ काचकाम | Glass Cutter |
| ३९. | क्रीडांगण/ मोकळ्या जागेसंबंधीत कामगार | Groundsman |
| ४०. | हातोडा चालविणे | Hammering |
| ४१. | घरे / इमारतींची अंतर्गत सजावट | Interior Decoration of Houses/Building |
| ४२. | मोठी यांत्रिक कामे जसे की यंत्रसामुग्री, पूलबांधणी इ. | Large mechanical works like Machinery, Bridges works etc |
| ४३. | उद्वाहन आणि स्वयंचलित जिने उभारणे | Lift and Escalators Fixing |
| ४४. | संगमरवर / दगडांचे काम | Marble/Stone Work |
| ४५. | गवंडी (राजगिरी) काम | Masonary (Rajgiri) |
| ४६. | खाण कामगार आणि खदान कामगार | Miner & Quarrier |
| ४७. | मिश्रणकाम (बांधकाम संबंधित) | Mixer Operation |
| ४८. | मोजेक (फरशी) पॉलिशिंग | Mosaic Polishing |
| ४९. | रंगारी / रंगकाम / पीओपी काम करणे | Painter/Painting/POP work |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| ५०. | नळ कारागीर/ नळ जोडणी करणे | Plumber/Plumbing |
| ५१. | रस्त्याचे काम करणे | Road work |
| ५२. | रोडरोलर चालन | Roller Driving |
| ५३. | छतावरण | Roofing |
| ५४. | वाळू उपसा | Sand Mining |
| ५५. | बांधकामस्थळावरील सुरक्षा रक्षक | Security Guard at Construction Site |
| ५६. | फवारणी किंवा मिश्रण काम (रस्ता बांधकामाशी संबंधित) | Spray Work or Mixing work (engaged in road construction) |
| ५७. | खडी यंत्र कामगार | Stone crusher |
| ५८. | दगड कटाई, फोडणी, भरड काम (दगडी खाण) | Stone cutting breaking for Grinding Works (Mining) |
| ५९. | दगड उत्खनन कार्य किंवा खाणकाम | Stone Quarries Work or Mining |
| ६०. | फरशा बसविणे | Tiles Fixing |
| ६१. | बोगद्याचे काम करणे | Tunnel Work |
| ६२. | संधाता (वेल्डिंग काम करणारा) | Welder |
| ६३. | विहीर खोदणे | Well Digging |
| ६४. | विहीरीतील गाळ काढून टाकणे / गोताखोर | Well Silt removing/diving |
| **क)** | **करमणूक व संबंधित कामे** | **Entertainment & Related** |
| ६५. | दृकश्राव्य कामाशी संबंधित कामगार | Audio and visual workers |
| ६६. | वाजंत्री | Band playing |
| ६७. | केबल टीव्ही व्यवसाय | Cable TV operation |
| ६८. | कॅडी (गोल्फ क्लबवरील सहायक) | Caddie |
| ६९. | कॅमेरामॅन | Cameraman |
| ७०. | सिनेमाशी संबंधित कामे | Cine Service |
| ७१. | सिनेमा प्रक्षेपणासंबंधित कामे | Cinema Projectionist |
| ७२. | सर्कस कलाकार | Circus Artist |
| ७३. | नर्तक | Dancers |
| ७४. | घोडेस्वार | Jockey |
| ७५. | जादूगार | Magician |
| ७६. | मॉडेल | Model |
| ७७. | कवी / लेखक | Poet / Writer |
| ७८. | पथनाट्य कलाकार | Street Performer |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| ड) | **आर्थिक, संप्रेषण व इतर संबंधित** | **Financial, Communication Related & Other** |
| ७९. | कार्यालय, उपहारगृह आणि इतर आस्थापनांमधील लेखापाल | Accountant in Office, Hotel and other Establishment |
| ८०. | बँक एजंट | Banking Agent |
| ८१. | कॉल सेंटर / ग्राहक सेवा कर्मचारी | Call Centre / Customer Care Executive |
| ८२. | कार्यालय, उपहारगृह आणि इतर आस्थापना मधील रोखपाल | Cashier in Office, Hotel and other Establishment |
| ८३. | बांधकाम आस्थापनांमधील लिपीक आणि लेखापाल, सर्व प्रकारचे कर्मचारी | Clerk / Accountant (All types of workers such as clerk and accountant in Construction Establishment) |
| ८४. | कार्यालय, उपहारगृह आणि इतर आस्थापनांमधील लिपीक आणि लेखापाल | Clerk / Accountant (All types of workers such as clerk and accountant in Office, Hotel and other Establishment) |
| ८५. | शिकवणी | Coaching service |
| ८६. | डेटा एंट्री ऑपरेटर | Data entry operator |
| ८७. | ई-वाणिज्य, ई-व्यापार | E-Commerce |
| ८८. | अभियंता | Engineer |
| ८९. | आर्थिक सल्लागार | Financial Adviser |
| ९०. | आयकर सल्लागार | Income Tax Advisor |
| ९१. | विमा एजंट | Insurance Agent |
| ९२. | माहिती व तंत्रज्ञान क्षेत्र | IT Sector |
| ९३. | पत्रकार | Journalist |
| ९४. | प्रयोगशाळा सहायक | Laboratory Assistant |
| ९५. | वकील | Lawyer |
| ९६. | विधी सहायक | Legal Assistant |
| ९७. | मीटर वाचक/ नोंद घेणारा | Meter Reader |
| ९८. | स्वयंसेवी संस्थांशी संबंधित | NGO Service |
| ९९. | किरकोळ व्यवहार क्षेत्र | Retail Sector |
| १००. | विक्री आणि विपणन | Sales & Marketing |
| १०१. | बचत गट, स्वयंसहायता गट | Self Help Group |
| १०२. | शेअर बाजार दलाल | Share Market broker |
| १०३. | शिक्षा मित्र | Siksha Mitra |
| १०४. | लघुलेखक | Stenographer |
| १०५. | पर्यवेक्षक | Supervisor |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| १०६. | शिक्षक | Teacher |
| १०७. | दूरध्वनी बूथ सेवा | Telephone booth service |
| १०८. | दूरध्वनीचालक | Telephone Operator |
| १०९. | टंकलेखक | Typist |
| ११०. | पंच / रेफरी | Umpire/ Referee |
| १११. | अकुशल कामगार | Unskilled Worker |
| ११२. | आज्ञावली विकासक | Web Developer |
| **इ)** | **अन्न आणि संबंधित** | **Food & Related** |
| ११३. | बेकरीचे काम | Bakery work |
| ११४. | खाटीक / चिकन / मांस पुरवठा कामाशी संबंधित | Butcher / Chicken / Meat Supply |
| ११५. | मिठाई व्यवसायाशी संबंधित | Confectionery |
| ११६. | अंडी पुरवठा कामाशी संबंधित | Egg Supply |
| ११७. | मासे आणि समुद्री खाद्य संबंधित | Fish & Sea Food Supply |
| ११८. | फळांचा पुरवठा कामाशी संबंधित | Fruit Supply |
| ११९. | किराणा दुकान कामगार/ किराणा दुकानदार | Grocery / Kirana Shop Worker |
| १२०. | अल्पोपहार तयारी कामाशी संबंधित | Snacks Preparation |
| १२१. | भाजीपाला पुरवठा काम | Vegetable Supply |
| **फ)** | **फेरीवाले, विक्री माल विक्री** | Hawking & Vending Related |
| १२२. | नारळ पाणी विक्रेता | Coconut Water Vendor |
| १२३. | फुलांचे काम आणि पुष्पहार तयार करणे | Flower work and garland making |
| १२४. | फळांचा रस विक्रेता | Fruit Juice Vendor |
| १२५. | हस्तकला निर्माता / विक्रेता | Handicraft Maker / Seller |
| १२६. | दुध वाला | Milkman |
| १२७. | वृत्तपत्र वितरक / विक्रेता | Newspaper Delivery / Selling |
| १२८. | पानवाला | Panwalla |
| १२९. | फेरीवाला / भाजीवाला / फळ वाला / पत्री विक्रेता | Rehadi/Thela wala Sabzi Wala / Fruit Wala / Patri Vendor |
| १३०. | शू शायनिंग / चांभार / बूट पॉलिश | Shoe Shining / Cobbler / Boot Polish |
| १३१. | रस्त्यावरील खाद्यपदार्थ/ झटपट खाद्यपदार्थ | Street Food / Fast Food Vendor |
| १३२. | रस्त्यावरील विक्रेता (खाद्यपदार्थां व्यतिरिक्त) | Street Vendor (other than food) |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| १३३. | चहा विक्रेता | Tea Vendor (Chai walla) |
| ग) | **आरोग्य, सौंदर्य आणि सदृढता संबंधित सेवा** | **Health, Beauty & Well Being Related Services** |
| १३४. | आशा व अंगणवाडी सेविका | Asha and Anganwadi workers |
| १३५. | ज्योतिषी | Astrologer |
| १३६. | ब्यूटीशियन / सलून / पार्लर | Beautician / Saloon / Parlour |
| १३७. | संगोपनकर्ता (आया) (वृद्ध व्यक्तींकरिता) | Caretaker (old persons) |
| १३८. | औषधांचे दुकान | Chemist / Medical Store |
| १३९. | बाल संगोपनकर्ता (आया) | Child Caretaker (Aaya) |
| १४०. | सामुदायिक आरोग्य कर्मचारी | Community Health Worker |
| १४१. | कंपाऊंडर | Compounder |
| १४२. | दंतचिकित्स सहाय्यक | Dental Assistant |
| १४३. | आहारतज्ज्ञ आणि पोषण विशेषज्ञ | Dietician and Nutritionist |
| १४४. | फिटनेस / जिम ट्रेनर | Fitness / Gym Trainer |
| १४५. | न्हावी, केशभूषाकार | Hair Dressing / Barber |
| १४६. | प्रयोगशाळा तंत्रज्ञ | Lab Technician |
| १४७. | जीवरक्षक | Life Guard |
| १४८. | मेहंदी कला | Mehandi Art |
| १४९. | माध्यान्ह भोजन कामगार | Mid day meal workers |
| १५०. | सुईण/दाई/प्रसविका | Midwife |
| १५१. | संगीत शिक्षक | Music Teacher |
| १५२. | नर्स/परिचारिका | Nurse |
| १५३. | चष्मा विक्रेता | Optician |
| १५४. | परावैद्यक कर्मचारी | Paramedical Staff |
| १५५. | रोगनिदान तंत्रज्ञ | Pathology Technician |
| १५६. | औषधनिर्माता | Pharmacist |
| १५७. | भौतिकोपचारतज्ज्ञ | Physiotherapist |
| १५८. | धार्मिक व्यावसायिक (पुजारी, पुरोहित इ.) | Religious Professional (Priest, Purohit etc.) |
| १५९. | खेळाचे शिक्षक | Sports Coach |
| १६०. | खेळाडू | Sportsperson |
| १६१. | शिक्षक | Teacher / Tutor |
| १६२. | पशुवैद्यकीय तंत्रज्ञ | Veterinary Technician |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| १६३. | वॉर्ड बॉय (परिचर) | Ward Boy |
| १६४. | एक्स-रे तंत्रज्ञ | X-Ray Technician |
| १६५. | योग प्रशिक्षक | Yoga Trainer |
| ह) | **आदरातिथ्य संबंधित** | **Hospitality Related** |
| १६६. | बारटेंडर | Bartender |
| १६७. | खाद्यपेय व्यवस्था | Catering |
| १६८. | कार्यालय, हॉटेल आणि इतर आस्थापनांमधील स्वच्छक | Cleaner in Office, Hotel and other Establishment |
| १६९. | क्लब आणि कॅन्टीन सेवा | Clubs and canteen service |
| १७०. | स्वयंपाकी | Cook |
| १७१. | कार्यक्रमासाठी सजावट | Decoration for function |
| १७२. | धोबी | Dhobi |
| १७३. | घरेलू कामगार | Domestic Worker / Maid |
| १७४. | हॉटेल आणि रेस्टॉरंट सेवा | Hotel and Restaurant service |
| १७५. | घराची देखभाल करणारा | Housekeeping Worker |
| १७६. | स्वयंपाकघर मदतनीस | Kitchen Helper |
| १७७. | कपडे धुणे / क्लिनिंग सेवा | Laundry/Drycleaning Services |
| १७८. | शिपाई / ऑफिस बॉय | Peon / Office Boy |
| १७९. | हमाल | Porter |
| १८०. | स्वागतकार | Receptionist |
| १८१. | सुरक्षा रक्षक (बांधकाम कामाव्यतिरिक्त) | Security Guard (other than Construction work) |
| १८२. | पर्यटन आणि आदरातिथ्य | Tourism and Hospitality |
| १८३. | पर्यटक मार्गदर्शक | Tourist Guide |
| १८४. | वेटर/ वाढपी | Waiter |
| १८५. | पहारेकरी | Watchman |
| १८६. | पाणी वाला | Water Carrier |
| य) | **उत्पादनाशी संबंधित** | **Manufacturing & Related** |
| १८७. | अगरबत्ती बनविणे | Agarbatti making |
| १८८. | बांगड्याचे उत्पादन | Bangle manufacturing |
| १८९. | बुरुडकाम | Basket Maker |
| १९०. | मणी बनविणे / छेदन करणे | Beads making / piercing |
| १९१. | विडी उत्पादन | Beedi Manufacture |
| १९२. | टिकली काम | Bindi work |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| १९३. | लोहार | Blacksmith |
| १९४. | आसवनीवरील काम (ब्रेवरीज/ डिस्टीलरीज) | Breweries Distilleries |
| १९५. | वीटांचे उत्पादन/ वीटभट्टीवर काम करणे | Brick manufacturing works at Brick kilns |
| १९६. | ब्रश बनविणे | Brush making |
| १९७. | बल्ब उत्पादन | Bulb manufacture |
| १९८. | वेताचे/ बांबूचे काम | Cane/Reed work |
| १९९. | चटई विणकाम | Carpet weaving |
| २००. | कापडावरील कशीदाकारी | Chikan work |
| २०१. | कापड छपाई | Cloth printing |
| २०२. | काथ्या प्रक्रिया / उत्पादन | Coir processing/manufacture |
| २०३. | रंगकाम | Dyeing |
| २०४. | विद्युतविलेपन | Electroplating |
| २०५. | लिफाफे बनविणे | Envelope making |
| २०६. | कारखाना कामगार | Factory Worker |
| २०७. | दारुकाम / फटाके उत्पादन | Fire work / Cracker production |
| २०८. | पिठाच्या गिरण्यांचे काम | Flour mills operations |
| २०९. | पादत्राणे उत्पादन | Footwear production |
| २१०. | ओतशाळा | Foundry |
| २११. | कपड्यांचे उत्पादन | Garment manufacture |
| २१२. | रत्नांवरील काम | Gem Cutting |
| २१३. | सरकी काढणे | Ginning |
| २१४. | काच उत्पादन | Glassware manufacturing |
| २१५. | सोनारकाम | Goldsmithy |
| २१६. | हस्तकला | Handicrafts |
| २१७. | हातमाग/ विणकाम | Handloom weaving |
| २१८. | दागिने निर्माता (सोन्याव्यतिरिक्त) | Jewellery Maker (other than gold) |
| २१९. | विणकाम करणारा | Knitter |
| २२०. | उत्पादन क्षेत्रातील कामगार | Labourer in Manufacturing |
| २२१. | खाणकामावरील मजूर | Labourer in Mining |
| २२२. | चुना बनविणे | Lime Making |
| २२३. | कुलूप बनविणे | Lock making |
| २२४. | यंत्र चालक | Machine Operator |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| २२५. | मसाला बनविणे | Masala making |
| २२६. | काडीपेटी उत्पादन | Matches manufacture |
| २२७. | गौण खनिज व खाण काम | Minor mineral and mines work |
| २२८. | वाद्य यंत्र निर्माता | Musical Instrument Maker |
| २२९. | तेल काढणे | Oil extraction |
| २३०. | इतर लघु उद्योग | Other Small scale industries |
| २३१. | पॅकिंग आणि पॅकेजिंग | Packing and Packaging |
| २३२. | कागद उत्पादन निर्माता | Paper Product Maker |
| २३३. | पापड बनवणे | Papad making |
| २३४. | औषध उद्योग | Pharmaceutical Industry |
| २३५. | लोणचे बनवणे | Pickle making |
| २३६. | संयंत्र ऑपरेटर | Plant Operator |
| २३७. | प्लास्टिक उत्पादन | Plastic Manufacture |
| २३८. | कुंभार | Potter |
| २३९. | यंत्रमागावरील विणकाम | Powerloom weaving |
| २४०. | मुद्रणालय कामगार | Printing Press Worker |
| २४१. | दगड खाण कामगार | Quarry work |
| २४२. | भात गिरणी | Rice milling |
| २४३. | दोरी तयार करणारा | Rope maker |
| २४४. | रबर आणि प्लास्टिक उत्पादने निर्माता | Rubber and Plastic Products Maker |
| २४५. | लाकूड कापण्याचे काम | Sawmill work |
| २४६. | साबण निर्मिती | Soap manufacture |
| २४७. | खेळ सामुग्री उत्पादन | Sports good manufacture |
| २४८. | पोलाद पात्रे व भांडी निर्मिती | Steel vessels and utensils manufacture |
| २४९. | तंबाखू प्रक्रिया | Tobacco processing |
| २५०. | कमानी (लपेटलेल्या आणि त्वचेच्या उत्पादनासह) चामड्याच्या वस्तू | Tanning (including hides and skin production) leather goods |
| २५१. | इमारती लाकूड उद्योग (फर्निचर मॅन्युफॅक्चरिंग इ.) | Timber Industry (Furniture manufacturing etc) |
| २५२. | तंबाखू उत्पादन निर्माता | Tobacco Product Maker |
| २५३. | खेळणी बनवणारा | Toy Maker |
| २५४. | विणकर | Weaver |
| २५५. | सांधकाम / फॅब्रिकेशन | Welding/Fabrication |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| **ज)** | **स्वच्छता संबंधी कामे** | **Sanitation Related** |
| २५६. | कचरा गोळा करणारा | Garbage collector |
| २५७. | चिंधी वेचक | Rag Picker |
| २५८. | नाले सफाईगार | Sewer Cleaner |
| २५९. | सफाई कामगार | Sweeper |
| **ख)** | **दुकान – सेवा / दुरुस्ती / देखभाल** | **Shop - Service/Repair/Maintenance** |
| २६०. | ऑटोमोबाईल (कार / स्कूटर / मोटरसायकल) यंत्रज्ञ | Automobile (Car/Scooter/Motorcycle) Mechanic |
| २६१. | सायकल / रिक्षा दुरुस्ती | Bicycle / Rickshaw Repair |
| २६२. | पुस्तक बांधणी | Book binding |
| २६३. | सुतारकाम | Carpentry |
| २६४. | संगणक / लॅपटॉप व नेटवर्किंग | Computer/Laptop and Networking |
| २६५. | वीजतंत्री/ विद्युतविषयक कामे | Electrician / Electric works |
| २६६. | गॅस स्टोव्ह / प्रेशर कुकर / शिवणकामाची मशीन दुरुस्ती | Gas Stove/Pressure Cooker/Sewing Machine Repair |
| २६७. | जनरेटर दुरुस्ती | Generator Repair |
| २६८. | इन्व्हर्टर दुरुस्ती | Inverter Repair |
| २६९. | लाइनमन | Lineman |
| २७०. | यंत्रज्ञ | Mechanic |
| २७१. | मायक्रोवेव्ह / मिक्सर ग्राइंडर दुरुस्ती | Microwave/Mixer Grinder Repair |
| २७२. | मोबाइल दुरुस्ती | Mobile Repair |
| २७३. | फोटो फ्रेम कामगार | Photo Framer |
| २७४. | छायाचित्रकार / व्हिडिओग्राफर | Photographer/Videographer |
| २७५. | प्रॉपर्टी डीलर | Property Dealer |
| २७६. | आरओ तंत्रज्ञ | RO Technician |
| २७७. | जोडे बनवणारा | Shoemaker |
| २७८. | दुकानदार / दुकान सहाय्यक | Shopkeeper/Shop Assistant |
| २७९. | शिंपी /शिवणकाम / भरतकाम | Tailor / Stitching / Embroidery |
| २८०. | तंत्रज्ञ | Technician |
| २८१. | टीव्ही / रेडिओ / इलेक्ट्रॉनिक / विद्युतसामान दुरुस्ती | TV/Radio /Electronic / Electrical Good Repairs |
| **ल)** | **प्रवास आणि वाहतूक संबंधित** | **Travel & Transport Related** |
| २८२. | बोट / नावेचा व्यवसाय | Boat / Ferry occupation |

| अ.क्र. | व्यवसायांची नावे (मराठी) | व्यवसायांची नावे (इंग्रजी) |
|---|---|---|
| २८३. | बैल / उंटगाडी चालक | Bullock/Camel-cart operation |
| २८४. | वाहक (बस, रेल्वे इ.) | Conductor (Bus, Railway etc.) |
| २८५. | कुरिअर सेवा | Courier service |
| २८६. | सायकलरिक्षा चालक | Cycle Rickshaw Puller |
| २८७. | जेवणाचा डब्बा पोहोचविणारे/ डबेवाला | Dabba wala |
| २८८. | डिलीवरी बॉय / कुरियर सेवा | Delivery Boy / Courier Service |
| २८९. | वाहन चालक (बस, कार, ऑटो रिक्षा, ट्रक, टेम्पो) | Driver (Bus, Car, Auto Rickshaw, Truck, Tempo) |
| २९०. | चालक (दुचाकी) | Driver (Two wheelers) |
| २९१. | वाहनचालक प्रशिक्षक | Driving Instructor |
| २९२. | हातगाडी खेचणारा, चालक | Hand Cart Puller |
| २९३. | माल चढविणारा व उतरविणारा | Loader & Unloader |
| २९४. | एलपीजी गॅस वितरण कामगार | LPG Gas Delivery Worker |
| २९५. | सामान बांधणी व पोचवणी | Packers and Movers |
| २९६. | पेट्रोल पंप व संबंधित सेवा | Petrol Pump and allied service |
| २९७. | सर्व्हिस स्टेशनचे काम | Service Station work |
| २९८. | ट्रॅव्हल एजंट | Travel Agent |
| २९९. | वाहन सफाईगार | Vehicle Cleaner |
| ३००. | इतर | Others |

-----